दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर), परांडा
जि. उस्मानाबाद यांना कार्यालय प्रमुख
आणि आहरण व संवितरण अधिकारी
म्हणून घोषित करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
विधि व न्याय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : डीडीओ-२३११/११४७/प्र.क्र.१५१/कार्या-आ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १ डिसेंबर, २०११

वाचा :- १) शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग,
क्र.सीआरसी-२३०८/६४७/(१४५)का-ब्राग, दिनांक २६ नोव्हेंबर, २०११
२) जिल्हा न्यायालय, उस्मानाबाद यांचे पत्र क्र.काव्यवि/(प्रशा)/१००५८, दि.२१ नोव्हेंबर, २०११.

**शासन निर्णय** :- उस्मानाबाद जिल्ह्यातील परांडा येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर), यांचे न्यायालय अनुक्रमांक १ च्या शासन अधिसूचनेन्वये दि. २० नोव्हेंबर, २०११ पासून कार्यान्वित झालेले आहे. उक्त न्यायालयातील न्यायिक अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन, भत्ते तसेच इतर कार्यालयीन व न्यायालयीन खर्चाची देयके सादर करण्यास व धनादेश वटविण्यास दिवाणी **न्यायाधीश (वरिष्ठ स्तर), परांडा** यांना **"कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरते मर्यादित आहेत.

२. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला उपविभाग एक, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक १ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(व.सं.पवार)
**कार्यासन अधिकारी**

प्रति,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई (पत्राने),
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि. उस्मानाबाद,
दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर), परांडा, जि.उस्मानाबाद,
महालेखापाल - (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-दोन, नागपूर,
महालेखापाल - (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-दोन, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद,
उपकोषागार अधिकारी, परांडा, जि. उस्मानाबाद,
वित्त विभाग (व्यय ८),
विधि व न्याय विभाग, का. २४ व २५,
निवड नस्ती